**नवीन महाविद्यालय सुरू करण्यास प्रदान करण्यात आलेले इरादापत्र व अंतिम मान्यता रद्द करणेबाबत.**
**(न्यायालयीन प्रकरण)**

**महाराष्ट्र शासन**
उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई- ४०० ०३२
शासन निर्णय क्र. HTED-२९०११/२/२०२४/८१९५८७-MHT-(HE-४)
दिनांक: १२ मार्च,२०२५

**संदर्भ:-**
१. शासन निर्णय क्रमांक HTED-२९०६६(११)/१/२०२४/७३०८९०-MHT-(HE-४), दिनांक १५.०२.२०२४.
२. शासन निर्णय क्रमांक HTED-२९०६६(११)/१२/२०२४/८११२१२-MHT-(HE-४), दिनांक १५.०७.२०२४.
३. मा. उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल याचिका क्र. ५४२३/२०२४ मधील दिनांक ०९.१०.२०२४ रोजीचे आदेश.

**प्रस्तावना:-**

शैक्षणिक वर्ष २०२४-२५ करीता शिराढोण,ता.कंधार,जि.नांदेड या बिंदूकरीता भिमाशंकर शिक्षण संस्था संचलित माधवराव पाटील पांडागळे महाविद्यालय, शिरढोण,ता.कंधार,जि.नांदेड (प्रतिवादी क्र. ५) या महाविद्यालयास संदर्भाधिन क्र. ०१ येथील शासन निर्णय, दिनांक १५.०२.२०२४ अन्वये इरादापत्र प्रदान करण्यात आले आहे. तसेच संदर्भाधिन क्र.०२ येथील शासन निर्णय, दिनांक १५.०७.२०२४ अन्वये अंतिम मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर भिमाशंकर शिक्षण संस्था संचलित माधवराव पाटील पांडागळे महाविद्यालय, शिरढोण,ता.कंधार,जि.नांदेड या महाविद्यालयास इरादापत्र प्रदान करण्यात आल्या विरूध्द श्री संत शिरोमणी मंथन स्वामी शिक्षण प्रसारक मंडळ या संस्थेने मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे याचिका क्रमांक ५४२३/२०२४ दाखल केली होती.

मा. उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल याचिका क्र. ५४२३/२०२४ मध्ये मा. उच्च न्यायालयाने दिनांक ०९.१०.२०२४ रोजी दिलेले आदेश विचारात घेवून, भिमाशंकर शिक्षण संस्था संचलित माधवराव पाटील पांडागळे महाविद्यालय, शिरढोण,ता.कंधार,जि.नांदेड या महाविद्यालयास

शैक्षणिक वर्ष २०२४-२५ करिता प्रदान करण्यात आलेले इरादापत्र तसेच अंतिम मान्यता रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

मा. उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल याचिका क्र. ५४२३/२०२४ मध्ये मा. उच्च न्यायालयाने दिनांक ०९.१०.२०२४ रोजी दिलेले आदेश विचारात घेवून, भिमाशंकर शिक्षण संस्था संचालित माधवराव पाटील पांडागळे महाविद्यालय, शिरढोण,ता.कंधार,जि.नांदेड या महाविद्यालयास शैक्षणिक वर्ष २०२४-२५ करिता संदर्भाधिन क्र. ०१ येथील शासन निर्णय, दिनांक १५.०२.२०२४ अन्वये प्रदान करण्यात आलेले इरादापत्र व संदर्भाधिन क्र. ०२ येथील शासन निर्णय, दिनांक १५.०७.२०२४ अन्वये प्रदान करण्यात आलेली अंतिम मान्यता याद्वारे रद्द करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०३१२१६४७४७५२०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

ASHOK SHANKAR MANDE

Digitally signed by ASHOK SHANKAR MANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=fabb29d28cdbcbe5c9eed052cb38b8cb567068a0090e237f095c6e50a52a6cf5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D96FF33E8AF31F745D84F3411F94D896382FAA82659B10108672887A87D6FC7C, cn=ASHOK SHANKAR MANDE
Date: 2025.03.12 16:48:41 +05'30'

**(अशोक मांडे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. मंत्री ,उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. राज्य मंत्री ,उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) अपर मुख्य सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) कुलसचिव, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड.

९) विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, नांदेड विभाग, नांदेड.
१०) विशि-५/विशि-४, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११) संबंधित संस्था (विद्यापीठामार्फत)
१२) निवडनस्ती (मशि-४).